# मराठ्यांच्या लढायांचा इतिहास

## भाग ६ - कोरेगावची लढाई १ जाने.१८१८

## १ जाने १८१८ ची कोरेगाव लढाई

भाग ६

१. शिरूर येथून नेटिव पायदळाची एक पलटण कर्नल बर यांनी ताबडतोब बोलाविली. त्याप्रमाणे पहिल्या 'बाँबे नेटिव्ह' इन्फन्ट्रीपैकी दुसरी बॅटालियन, दोन तोफा आणि अडीचशे

घोडेस्वार, इतके सैन्य आपल्याबरोबर घेऊन कॅप्टन स्टॉटन हा ता. ३१ डिसेंबर १८१७ रोजी रात्री ८ वाजता शिरूरहून निघाला, आणि २७ मैलांची मजल मारून ता. १ जानेवारी १८१८ रोजी सकाळी १० वाजता तो कोरेगावच्या जवळील एका टेकडीवर येऊन पोहोचला. परंतु तेथे येऊन त्या टेकडीवर त्याने पाहिले, तो त्या टेकडीच्या खालच्या खोऱ्यात भीमा नदीच्या उजव्या किनाऱ्याच्या काठाने जिकडेतिकडे पेशव्यांचे प्रचंड सैन्य पसरलेले त्याला दिसले.

२. तेव्हा इतक्या मोठ्या सैन्यापासून उघड्या मैदानावर आपला बचाव होणे शक्य नाही असे वाटून त्याने कोरेगावच्या तटबंदीच्या आत आपले सैन्य नेऊन ठेवण्याचा प्रयत्न सुरू केला. इकडे इंग्लिशांचे सैन्य गावात शिरत आहे असे पाहून त्याला तेथून हुडकून काढण्याकरिता पेशव्यांचे सैन्यही भीमा नदी उतरून पलीकडे जाऊ लागले. या वेळी पेशव्यांचे सैन्य भीमा नदीच्या उजव्या तीरावर असून इंग्लिश इतिहासकारांच्या अदमासाप्रमाणे त्या सैन्यात सुमारे वीस हजार घोडेस्वार आणि आठ हजार पायदळ इतके लोक होते. ह्यांपैकी काही लोक भीमा नदी उतरून इंग्लिशांना मागे हटविण्याकरिता कोरेगावात शिरले.


सकाळी १० नंतर इंग्रजी
सेना भीमेच्या डाव्या
किनाऱ्यावर हळू हळू जमत
एक तोफ समोरुन येणाऱ्या
अरबांच्या फळीला थोपवेना. ती
पेशव्यांच्या हातात पडायला नको
म्हणून माघार घेऊन ती तोफ
किल्ल्यात आणली.
अरबांना पिटाळून कसेबसे रात्रभरच्या
प्रवासाने दमलेले सैन्य एका किल्ल्यात
जमले.
Untitled Placemark
Apati
Talegaon Dhamdhere
Sanaswadi
कोरेगाव भीमा रणस्तंभ
Koregaon Bhima
Lonikand
Perne
या टेकडीवरुन बाजीरावसाहेब
सैन्य कारवाईची पाहाणी करत होते.
पेशव्यांचे अरबसैन्य नदीच्या उजव्या
किनाऱ्यावरुन कोंडीत पकडायला गेले.
इंग्रजांना कोंडीत घेरले गेले,

३. या गावाला त्या वेळी तटबंदी फार चांगली आणि मजबूत अशी होती. या गावात ता. १ जानेवारी रोजी दुपारच्या वेळी दोन्ही बाजूंच्या लोकांची मिळून फारच गर्दी झाली. इंग्लिशांचे पायदळ, घोडेस्वार, सामानसुमानाचे बैल आणि बाजारबुणगे लोक हे सगळे आधीच गावात शिरून राहिले होते व त्यांच्यावर हल्ला करण्याकरिता पेशव्यांचे लोकही दुसऱ्या बाजूने गावात शिरले. इंग्लिशांच्यापाशी दोन तोफा होत्या. त्या त्यांनी पहिल्याने भीमा नदीच्या पात्रातील पायउताराच्या वाटेच्या रोखाने डागून ठेवल्या होत्या. पण त्यांचा फारसा उपयोग झाला नाही. म्हणून त्यांनी त्या गावच्या तटबंदीच्या आत आणून माऱ्याच्या जागी ठेवल्या.

४. इंग्लिशांचे सैन्य साऱ्या रात्रभर चालून अगदी थकून गेलेले होते; व त्याला जी विश्रांती पाहिजे होती ती न मिळता त्याला एकदम शत्रूच्या सैन्याशी तोंड देणे भाग पडले. दुपारच्या उन्हामुळे त्यांना त्या वेळी अतिशय त्रास होत होता व ते लोक जरी तहानेने व्याकूळ झालेले होते, तरी पेशव्यांच्या माऱ्याच्या भीतीने भीमा नदीच्या पाण्यावर जाणेही त्यांना त्या वेळी शक्य नव्हते.

५. त्याचप्रमाणे त्या कोरेगावच्या लहानशा तटबंदीच्या आतमध्ये इंग्लिशांचे इतके सैन्य भरले होते की त्यांना आजूबाजूला फिरण्यालाही वाव मिळणे शक्य नव्हते.




सौजन्य - डॉ. उदय कुलकर्णींचे लेखनातून

६. अडचणीच्या जागेत सापडलेल्या या इंग्लिश सैन्यावर हल्ला करण्याकरिता एक-एक हजार आरबाची एक तुकडी, अशा एकंदर तीन तुकड्या चाल करून पुढे आल्या. त्या वेळी त्या लहानशा जागेत त्या उभय सैन्यामध्ये जे युध्द झाले, ते केवळ संगिनीचे आणि तरवारीचेच झाले. दुरून गोळी घालणे आणि लढाई करणे हे या ठिकाणी शक्यच नव्हते. इंग्लिशांच्या तोफांचा मारा मधून-मधून चाललेला होता, पण त्यांच्या त्या दोन तोफांपैकी एक तोफ पेशव्यांच्या लोकांनी हल्ला चढवून काबीज केली.

७. तोफेवरील मुख्य अधिकारी, लेफ्टनंट चिशोल्म, याला ठार मारण्यात येऊन त्याच्या धडापासून त्याचे डोके कापून ते पेशव्यांकडे विजयाचे चिन्ह म्हणून पाठवून देण्यात आले. त्याचप्रमाणे इंग्लिशांच्या बाजूकडील लेफ्टनंट स्टॉंटन आणि लेफ्टनंट कोनेलन व असिस्टंट सर्जन बुईंगेट यांना जबर जखमा झाल्या; म्हणून गावात जी एका देवळाजवळची धर्मशाळा होती. त्या धर्मशाळेच्या इमारतीत त्या जखमी झालेल्या ऑफिसरांना नेऊन ठेवण्यात आले. पण काही वेळाने ती धर्मशाळाही पेशव्यांच्या लोकांनी हस्तगत करून घेतली आणि तेथे

जखमी होऊन पडलेले असिस्टंट सर्जन मि. बुईंगेटना मारण्यात आले व बाकीच्या ऑफिसरांवरही लवकरच तसाच प्रसंग येणार होता. पण कॅप्टन स्टाँटन यांनी लगट करून ती धर्मशाळा फिरून हस्तगत करून घेतली. या धर्मशाळेशिवाय गावामध्ये एक मजबूत गढी होती ती आपल्या हस्तगत करून घ्यावी, ही गोष्ट इंग्लिशांच्या ध्यानात न आल्या ती तशीच मोकळी राहिलेली होती. ती पेशव्यांच्या लोकांनी आपल्या ताब्यात घेतल्यामुळे त्यांना ती एक सुरक्षितपणाची चांगलीच जागा मिळाली इतर ठिकाणाहून पेशव्यांच्या लोकांनी जेव्हा अतिशय नेट केला. लढाईचे एक प्रातिनिधिक पेंटींग इंग्रजांच्या बाजूने काढलेले असल्याने कॅप्टन स्टाँटन जोशात पुढे जात आहे अंधाऱ्या कोपऱ्यात अरब सैनिक, हात वर केलेले काही पेशव्यांचे शरणार्थी सैनिक दाखवणे अपेक्षित असावेत.



Anglo-Maratha war. Credit: Wikipedia

लढाईचे एक प्रातिनिधिक पेंटींग इंग्रजांच्या बाजूने काढलेले असल्याने कॅप्टन स्टाँटन जोशात पुढे जात आहे अंधाऱ्या कोपऱ्यात अरब सैनिक, हात वर केलेले काही पेशव्यांचे शरणार्थी सैनिक दाखवणे अपेक्षित असावेत.

८. परंतु त्या सैन्यातील कमांडिंग ऑफिसर, कॅप्टन (आयन) स्टाँटन्, याला अद्यापि थोडीशी आशा होती; व म्हणून आपल्या लोकांनी आशा न सोडता असेच काही वेळ टिकाव धरून राहावे, असा त्याने आपल्या सैन्याला सल्ला दिला. त्यामुळे दोन्ही सैन्ये पुढे तशीच लढत राहिली; पण त्या अडचणीच्या जागेत इंग्लिशांच्या लोकांना ठिकठिकाणी कोंडून आणि अडकवून ठेवण्यापेक्षा दुसरे काही करता येणे पेशव्यांच्या सैन्याला शक्य नव्हते. यामुळे इतके कार्य करून आणि इंग्लिशांवर शरण येण्याइतकी पाळी आणून रात्री 9 वाजण्याच्या सुमारास पेशव्यांचे सैन्य आपल्या छावणीकडे येण्याकरिता परत निघाले. पेशव्यांचे सैन्य पलिकडच्या काठावर परत गेल्यानंतर रात्रीच्या काळोखात साऱ्या दिवसाच्या तहानलेल्या इंग्लिशांच्या त्या शिपायांना नदीचे पाणी प्यावयाला मिळाले नव्हते! कारण पेशव्यांच्या सैन्याने साऱ्या दिवसात त्यांना पाणी देखील मिळू दिले नाही...

अशा रीतीने कॅप्टन स्टाँटन् यांच्या हाताखालील लोकांचा पूर्णपणे पराभव करून दुसरे दिवशी पेशव्यांचे सैन्य पुण्याकडे वळले. व त्या सैन्याचा तळ लोणीकंद येथे येऊन पडला.

E ने दर्शवलेल्या घोड दळाने घेरलेले होते.

E पायदळाच्या तुकड्यांनी घेरलेले होते...

(चिंचोळ्या गढीत इंग्रज अडकलेले असताना त्यांवर रातोरात हल्ला का केला गेला नाही हे न कळे)




वरील प्रकारे मराठ्यांची सरशीची वेळ असताना बाजीरावसाहेबांनी दुसऱ्या दिवशी पुण्याकडे न जाता राजेवाडी-सासवड करते पळापळीच्या दुसऱ्या फेरीला सुरवात केली...! त्यातच पंढरपुरजवळ अष्ट्याजवळ पराभूत व्हायची वेळ आली...!

वरील प्रकारे मराठ्यांची सरशीची वेळ असताना बाजीरावसाहेबांनी दुसऱ्या दिवशी पुण्याकडे न जाता राजेवाडी- सासवड करते पळापळीच्या दुसऱ्या फेरीला सुरवात केली...! त्यातच पंढरपुरजवळ अष्टी गावापाशी पराभूत व्हायची वेळ आली...!

कोरेगाव येथे पेशव्यांच्या सैन्याला जो जय मिळाला या योगाने त्या सैन्यातील शिपायांच्या मनात पुढील विजयाच्याही उत्पन्न झालेल्या होत्या; व कॅप्टन स्टाँटन हा आपले लोक त्या कोरेगावच्या तटबंदीतून काढून लोणीकंदच्या मोकळ्या मैदानावर घेऊन येईल, आपण त्याचा फिरून पुरा फन्ना उडवून टाकू, अशीही त्यांना खात्री होती. म्हणून त्याने लोणीकडे यावे, यासाठी त्याच्याकडे काही खोटे और कित्येक हेरांच्या बरोबर पाठविण्यात आले होते, असे म्हणतात.

९. (तिकडे) ब्रिगेडिअर जनरल स्मिथ यांच्या हाताखालील सैन्याची. पण इकडे कोरेगावास इंग्लिशांच्या सैन्यावर इतका कहर गुजरत असताना ते सैन्य कोठे आहे याची कॅप्टन स्टाँटन यांना काही एक बातमी नव्हती; मग त्या सैन्याच्या मदतीची गोष्ट तर लांबच राहिली. जनरल

स्मिथ यांचे सैन्य संगमनेरहून पेशव्यांचा पाठलाग करीत जे निघाले, त्याला ओझरच्या घाटाच्या डोंगरातून त्रिंबकजी डेंगळ्याच्या रामोशांनी इतके सतावून सोडले होते की, त्या डोंगरातून येताना स्मिथसाहेबाचे बरेच दिवस मोडले; आणि कोरेगावच्या लढाईत इंग्लिशांचे सैन्य ता. १ जानेवारी रोजी नामोहरम होऊन गेल्यानंतर मग दुसऱ्या दिवशी म्हणजे ता. २ जानेवारी रोजी, स्मिथसाहेबाच्या हाताखालील फोर्थ डिव्हिजनचे लोक  चाकण मुक्कामी येऊन पोहोचले. पण आता त्यांच्या येण्याचा कॅप्टनला उपयोगही नव्हता व ते (कुठवर) आले आहेत हे त्यांना माहितही नव्हते. अशा स्थितीत आपले जखमी झालेले लोक घेऊन आल्या वाटेने शिरूरला परत जाण्याशिवाय कॅप्टन स्टाँटन याना दुसरा मार्गच उरलेला नव्हता: ते ता. २ रोजी रात्री निघून शिरूरला परत गेले. येणे प्रमाणे या कोरेगावच्या लढाईची हकिकत आहे.

...

१०. इंग्लिशांच्या बाजूच्या सुमारे आठशे लोकांपैकी २७५ लोक या लढाईत मारले गेले. यावरून पेशव्यांच्या सैन्याने मिळविलेल्या विजयाची कोणालाही योग्य कल्पना

येण्यासारखी आहे. अशी जरी खरी वस्तुस्थिती आहे, तरी या कोरेगावच्या लढाईतही आमचाच जय झाला, असे इंग्लिश इतिहासकार लोकांना सांगण्याला यत्किंचितही कचरत नाहीत ! व कोरेगावच्या समोरच्या बाजूला भीमानदीच्या उजव्या काठावर आपल्या या जयाची निशाणी म्हणून ब्रिटिश सरकारने १८२२ मध्ये एक जयस्तंभही उभारलेला असून त्याच्यावर ज्या अनेक गोष्टी लिहिलेल्या आहेत, त्यांमध्ये One of the proudest triumphs of the British Army in the East (म्हणजे, पुर्वेकडील देशात ब्रिटिश सैन्याला जे अनेक विजय मिळाले आहेत, त्यामध्ये अतिशय गर्व वहाण्यासारखा हा एक विजय आहे !) असेहि लिहिण्यात आलेले आहे ! ब्रिटिश सैन्य इतक्या धडधडीत रीतीने येथे नामोहरम झालेले असताना देखील अतिशय गर्व वाहण्यासारखा हा विजय होता, असे म्हणून इंग्लिशांकडून जयस्तंभ उभारले जातात, यावरून पूर्वीचे खोटे इतिहास कसे बनविण्यात आलेले आहेत, याच्याबद्दलची कल्पना कोणालाही येण्यासारखी आहे

आजकाल कोरेगावचा विजय स्तंभ अस्मितेचा प्रश्न झाला आहे. त्यामुळे या लढाईच्या निमित्ताने त्यावर भाष्य करायला हवे किंवा नको असे न ठरवता तटस्थपणे पाहायला हवे... लढ्यातील एक घटना म्हणून त्या स्तंभाचा आदर करणे गरजेचे आहे.

जयस्तंभ, त्यातील चारी बाजूने संगमरवरावर कोरून लिहिलेली माहिती, तो स्तंभ निर्मितीसाठी केला गेलेला खर्च, वरिष्ठांच्या परवानग्यातील पत्रव्यवहार, त्यात झालेला काल अपव्यय, इंग्रजी लेखनाचे त्याकाळातील मराठीत केले गेलेले कोरीव भाषांतर, लिहायची पद्धत यावरही वाचकांचे मन आकर्षिक करावेसे वाटते.

अधिक माहितीसाठी विपुल लेखन उपलब्ध आहे. इच्छुकांनी त्याचा लाभ घ्यावा.

जयस्तंभ

कप्तान स्टाँटन साहेबाच्या स्वाधीन मुंबई सरकारच्या पलटणचे लोक ५०० व स्वार २५० व तोफखान्याची मनुष्ये
२५ व तोफा २ होत्या त्याजवर सन् इसवी १८१८ च्या जानेवारी तारीख १ शके १७३९ मार्गशीर्ष वद्य ९ गुरुवार ते
दिवशी कोरेगांवच्या मुक्कामी पेशव्यांच्या सारे फौजेने चालून येऊन घेरा दिला आणि अखेर बहुत खरे निवडक लो
क पेशव्यांचे यांनी मोठ्या चढायावर चढाया केल्या असतां पेशव्यांच्या फौजेचा मोड करून इंग्रेजी लोका
नी जय मेळविला ही कीर्ती राहावी म्हणून हा जयस्तंभ उभारिला आहे यावर या वीरांचा पराक्रम व सर्का
री चाकरी विषई इमाणास उदार झाले हा लोकीक बहुत काळ राहावा यास्तव त्यांच्या पलटणाची व लढाईत पडले
व जखमी जाहाले यांची नावें इंग्रेजी सरकारची आज्ञा होऊन या जयस्तंभावर दुसऱ्या अंगास लिहिली आहेत

सन् इसवी १८२२
शके १७४३

# लढाईत सहभागी जखमी वा मृतांची मराठीत कोरलेली नावे

